**महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) पदावर**
**<u>तदर्थ (Ad-hoc) पदोन्नती देण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आकृवि १२०९/प्र.क्र. ४८७/१५-अे (अ.क्र.२)**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक- ९ जुन,२०११.**

**<u>वाचा:</u>** १) शासन निर्णय क्र.आकृवि १२०९/प्र.क्र.४८७/१५अे (अ.क्र.१), दि.२६.३.२०१०
२) शासन निर्णय क्र.आकृवि १२०९/प्र.क्र.४८७/१५अे (अ.क्र.२), दि.२६.३.२०१०
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.पीआरएन/कृप ते कृअ पदो/२००९/भाग-२/ आस्था-४/४१३ दि.१५.५.२०१० व दि.२६.११.२०१० ची पत्रे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

**कृषि पर्यवेक्षक** (वेतनश्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे - ४२००) संवर्गातील १०८ कृषि पर्यवेक्षकांना **महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ)** (वेतनश्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे - ४४००) या पदावर संदर्भाधीन क्र.१ दि.२६.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये तात्पुरती पदोन्नती देण्यात आली आहे. तथापि सदर आदेश निर्गमित झाल्यानंतर काही पात्र उमेदवारांची सामाईक ज्येष्ठतासुचीत शैक्षणिक अर्हता, जात प्रवर्ग इत्यादी बाबत चुकीची नोंद झाल्यामुळे त्यांना पदोन्नती मिळाली नसल्याने संबंधितांनी सदर बाब निदर्शनास आणून दिल्यानंतर अशा पात्र उमेदवारांचा विचार करुन त्यांना कृषि पर्यवेक्षक या गट-क पदावरुन म.कृ.से.गट-ब (कनिष्ठ) या संवर्गात पदोन्नती देऊन पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. अशाप्रकारे ज्येष्ठतम अधिका-यांच्या समावेशनामुळे संदर्भ क्र.१ च्या आदेशान्वये यापुर्वी म.कृ.से.गट-ब (कनिष्ठ) पदावर पदोन्नती दिलेल्या कनिष्ठतम अधिका-यांची नांवे उपरोक्त कारणास्तव ज्येष्ठतेनुसार संदर्भ क्र.२ च्या तद्‌र्थ पदोन्नती आदेशात समाविष्ट होतील. सदर अधिका-यांची नांवे सोबतच्या **परिशिष्ट-अ** मध्ये दर्शविण्यात आली आहेत. सदर अधिकारी पदोन्नती सुचीतुन तद्‌र्थ पदोन्नतीसुचीत वर्ग झाले तरी त्यांच्या सध्याच्या पदस्थापना तशाच ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

याशिवाय संदर्भाधीन क्र.२ दि.२६.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये विभागातील कृषि पर्यवेक्षक यांना ज्येष्ठतेनुसार म.कृ.से.गट-ब (कनिष्ठ) संवर्गात तद्‌र्थ पदोन्नती (Ad hoc) देण्यात आली आहे. तथापि,सदर आदेश निर्गमित झाल्यानंतर काही पात्र उमेदवारांची सामाईक ज्येष्ठतासुचीत शैक्षणिक अर्हता, जात प्रवर्ग इत्यादी बाबत चुकीची नोंद झाल्यामुळे त्यांना ज्येष्ठ असुनही तद्‌र्थ पदोन्नती देता आली नव्हती. सदर बाब संबंधितांनी निदर्शनास आणुन दिल्यानंतर अशा पात्र उमेदवारांची पात्रता तपासुन त्यांना कृषि पर्यवेक्षक या गट-क पदावरुन म.कृ.से.गट-ब (कनिष्ठ) या संवर्गात ज्येष्ठतेप्रमाणे तद्‌र्थ (Ad hoc )

पदोन्नती देवुन पदस्थापना देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच या अधिका-यांच्या संदर्भ.क्र.२ च्या आदेशातील तद्‌र्थ (Adhoc ) पदोन्नती सुचीमध्ये समावेश करण्यास व **परिशिष्ट- ब** मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदी पदोन्नतीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संदर्भ क्र.१ दि.२६.३.२०१० च्या आदेशान्वये म.कृ.से.गट-ब (क) पदावर तद्‌र्थ (Adhoc) पदोन्नती दिलेल्या परंतु पदोन्नतीच्यावेळी **मागासप्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यामुळे पदस्थापना न दिलेल्या अधिका-यांनी** आता शासनास जाती वैधता प्रमाणपत्र सादर केल्याने अशा अधिका-यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. संबंधितांची नांवे सोबतच्या **परिशिष्ट -क** मध्ये दर्शविण्यात आली आहेत.

२. **परिशिष्ट- अ,ब,क** नुसार **महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ)** (वेतनश्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे -४४००) या पदावर पदोन्नती होणारे संबंधित अधिकारी ज्या दिनांकाला आपल्या पदाचा प्रत्यक्ष कार्यभार स्विकारतील, त्या दिनांकापासून ११ महिन्यांसाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त तदर्थ ( **Ad hoc** ) पदोन्नती व पदोन्नतीने पदस्थापना देण्यास शासन मान्यता येत आहे.

३. **सदर पदोन्नती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

i) उपरोक्त अधिका-यांची तदर्थ ( **Ad hoc** ) पदोन्नती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध झाल्यानंतर अथवा ११ महिन्यांसाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यन्त यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त चालू राहिल व या कालावधीनंतर सदर पदोन्नती आदेश आपोआप संपुष्टात येतील.

ii) उपरोक्त अधिका-यांची पदोन्नती तदर्थ ( **Ad hoc** ) असल्याकारणाने त्यांना सदरच्या पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवा जेष्ठतेसाठी हक्क सांगता येणार नाही. ज्यावेळी अशा अधिका-यांच्या पदोन्नत्या नियमित होतील, तेव्हापासून त्यांची जेष्ठता निर्धारित करण्यात येईल.

iii) कोणत्याही अधिका-यास कोणत्याही कारणास्तव मानीव दिनांक मिळाल्यामुळे अथवाआरक्षणामुळे सेवा जेष्ठतेत अथवा निवड सूचीत बदल झाल्यास कनिष्ठतम अधिका-यास कोणतीही पूर्व सूचना न देता पूर्व संवर्गात पदावनत करण्यात येईल.

iv) संबंधित अधिकाऱ्यांची पदोन्नती त्यांना त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे सेवेत ठेवण्याबाबतच्या पुनर्विलोकनाच्या कार्यवाहीच्या अधीन राहील.

v) उपरोक्त अधिका-यांच्या तद्‌र्थ पदोन्नतीस ११ महिन्यांचा कालावधी पुर्ण होईपर्यंत महाराष्ट्र लोकसेवा

आयोगाकडुन सरळसेवेचे उमेदवार उपलब्ध न झाल्यास संबंधित अधिका-यांच्या महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) पदावरील हजर दिनांकापासुन त्यांच्या पदोन्नतीमध्ये १ दिवसाचा तांत्रिक खंड देवुन पुनश्च तदर्थ पदोन्नती पुढे चालु ठेवण्याबाबत आदेश कृषि आयुक्तालय स्तरावरुन निर्गमित करावे आणि पदोन्नतीमध्ये दिलेल्या तांत्रिक खंडाची नोंद संबंधितांच्या सेवा अभिलेख्यात घ्यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**

s/Dhakane

**( संदिप ढाकणे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
कृषि सह संचालक (आस्थापना) कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व विभागीय कृषि सह संचालक
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर
संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, {व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे}
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, {व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे}
सर्व संबंधित अधिकारी, {व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे}
निवडनस्ती

**कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र.आकृवि-१२०९/प्र.क्र.४८७/१५अे, दि.९.६.२०११ सोबतची**

**परिशिष्टे**

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिका-याचे नांव व पदनाम | प्रवर्ग | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | ५४३ | श्री.एस.पी.गायकवाड | खुला | तदर्थ |
| २ | ५४५ | श्री.आर.ए.जाधव | खुला | तदर्थ |
| ३ | ५४६ | श्री.के.एस.कुलकर्णी | खुला | तदर्थ |
| ४ | ५४७ | श्री.एस.एम.एस.अल्लाउद्दीन | खुला | तदर्थ |
| ५ | २६६७ | श्री.डी.एस.तावडे | भ.ज.ब | तदर्थ |

**परिशिष्ट-ब**

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.अशोक रंगनाथ गुरव, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, परांडा जि.उस्मानाबाद | इमाव | श्री.गुरव यांना कृषि अधिकारी पदावर पदोन्नती देण्यात येत असुन त्यांचे पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. |
| २ | श्री.लहु ज्ञानदेव सांगळे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, तुळजापुर जि.उस्मानाबाद | खुला | मंडळ कृषि अधिकारी, शिराढोण जि.उस्मानाबाद या रिक्त पदावर |
| ३ | श्री.आर.एस.शेळके, कृषि पर्यवेक्षक, उप विभागीय कृषि अधिकारी, नाशिक | खुला | मंडळ कृषि अधिकारी, मनमाड जि.नाशिक या रिक्त पदावर |
| ४ | श्री.जी.जे.ठाकुर, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, उरण जि.रायगड | खुला | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, खालापूर जि.रायगड या रिक्त पदावर |
| ५ | श्री.ए.डी.जाधव, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, औसा जि.लातूर | खुला | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, निलंगा जि.लातूर या रिक्त पदावर |
| ६ | श्री.एल.एल.रकिबे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, दिंडोरी जि.नाशिक | खुला | कृषि अधिकारी, विभागीय कृषि सह संचालक, नाशिक या रिक्त पदावर |
| ७ | श्री.एस.व्ही.लोखंडे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, दहिवडी जि.सातारा. | अ.जा. | श्री.लोखंडे यांना कृषि अधिकारी पदावर पदोन्नती देण्यात येत असुन त्यांचे पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | श्री.के.डी.सोनटक्के, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, अमरावती जि.अमरावती | अ.जा. | मंडळ कृषि अधिकारी, हरीसाल ता.धारणी जि.अमरावती या रिक्त पदावर |
| ९ | श्री.डी.आर.वानखेडे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, एरंडोल जि.जळगांव | अ.जा. | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, धरणगांव जि.जळगांव या रिक्त पदावर |
| १० | श्री.ए.एच.अहिरे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, सिंदखेडा जि.धुळे | अ.जा. | मंडळ कृषि अधिकारी, सोनगीर जि.धुळे या रिक्त पदावर |
| ११ | श्रीमती एल.एस.डोंगरे, कृषि पर्यवेक्षक विभागीय कृषि सह संचालक, नागपूर जि.नागपूर | अ.जा. | कृषि अधिकारी, विभागीय कृषि सह संचालक, नागपूर या रिक्त पदावर |
| १२ | श्री.एल.एम.कोळी, कृषि पर्यवेक्षक, विभागीय कृषि सह संचालक, लातूर | विमाप्र | कृषि अधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सोलापूर या रिक्त पदावर |

**परिशिष्ट-क**

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री.रविकांत एम.रहाटे, कृषि पर्यवेक्षक, तालुका कृषि अधिकारी, उल्हासनगर जि.ठाणे | मंडळ कृषि अधिकारी, अंबाडी जि.ठाणे या रिक्त पदावर |
| २ | श्रीमती विनोदिनी सुनिल जांभुळकर, कृषि पर्यवेक्षक, उप विभागीय कृषि अधिकारी, उमरखेड जि.नागपूर | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, हिंगणा जि.नागपूर या रिक्त पदावर |